नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील श्री.दादासाहेब चाबुकस्वार यांच्या "उप आयुक्त" या पदावरील नियुक्तीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५(४) नुसार मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः- नमुंम-१२१३/प्र.क्र.११०/नवि-२८**

मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक:- १५ ऑक्टोबर, २०२०**

संदर्भ:- १) नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. ११२३, दि.०८.०२.२०१०.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.१२१५/३९४/प्र.क्र.१६/१५/नवि-२८, दि.२१.०८.२०१७.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र.नमुंमपा/प्रशा/आस्था-२/ प्र.क्र.३३/८८४/२०२०, दि.१६.०३.२०२०.

प्रस्तावना-

आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील श्री.दादासाहेब चाबुकस्वार, सहाय्यक आयुक्त यांच्या "उप आयुक्त" या पदावरील नियुक्तीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५(४) अन्वये शासन मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन दि.१६.०३.२०२० च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. नवी मुंबई महानगरपालिकेच्या आकृतीबंधास संदर्भीय दि.२१.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजुरी देण्यात आली आहे. त्यानुसार महानगरपालिकेच्या आस्थापनेवर उप आयुक्तांची १० पदे मंजूर आहेत.

३. श्री.दादासाहेब चाबुकस्वार यांना "उपआयुक्त" पदी पदोन्नती देण्यासंदर्भात अनुसूचित जाती कल्याण समितीने केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने पदोन्नती समितीने त्यांना पदोन्नती देण्याची शिफारस केली. त्यास नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभेने ठराव क्र.११२३, दि.८.०२.२०१० अन्वये मंजुरी दिली आहे. त्याअनुषंगाने श्री.दादासाहेब चाबुकस्वार यांच्या "उपआयुक्त" या पदावरील पदोन्नतीने दिलेल्या नियुक्तीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५ (४) मधील तरतुदीनुसार मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

नवी मुंबई महानगरपालिका सर्वसाधारण सभेने ठराव क्र.११२३, दि.०८.०२.२०१० अन्वये दिलेली मान्यता विचारात घेता, श्री.दादासाहेब चाबुकस्वार यांना "उपआयुक्त" नवी मुंबई महानगरपालिका या पदावर पदोन्नतीने दिलेल्या नियुक्तीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५(४) अन्वये शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०१०१४१५४०५६१७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2020.12.04 12:58:22 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, जि. ठाणे.
५) प्रधान सचिव (नवि-२) महोदयांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उप सचिव (नवि-२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती (नवि-२८).